**सन २०१९-२० मध्ये राज्य प्रशिक्षण धोरणातंर्गत तांत्रिक प्रशिक्षणासाठी शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे या योजनेंतर्गत रु.१०.०० लक्ष निधी वितरणाबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र. ६१/३-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
**दिनांक : १३ मार्च, २०२०**

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/ प्र.क्र.३९/०९/१२- अ, दि.२३.९.२०११
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०१९/प्र.क्र६१/३-अे दि. ३०.०७.२०१९
३) संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र.कृआ/ प्रशिक्षण/ प्र.क्र.३/ विप्र-५/५३१३/१९, दि. ०७.०२.२०२०
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.२२.०१.२०१९

प्रस्तावना -

राज्य शासनातील सेवेत असलेल्या सर्व स्तरातील अधिकारी व कर्मचा-यांची कार्यक्षमता वाढवुन गतिमान प्रशासन होण्याकरिता राज्यातील सर्व कर्मचारीवृंद यांना प्रशिक्षण देण्याबाबत राज्य शासनाने संदर्भाधीन दि.२३.९.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण जाहीर केले आहे.

सन २०१९-२० मध्ये राज्य प्रशिक्षण धोरणातंर्गत तांत्रिक प्रशिक्षणासाठी शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे ही योजना राबविण्यासाठी रु. १०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.त्यानुषंगाने, सदर योजनेंतर्गत कृषि विभागाच्या क्षेत्रीय स्तरावरील अधिकारी व कर्मचारी यांना तांत्रिक प्रशिक्षण देण्यासाठी रु. ७५ लक्षच्या मर्यादेत व मंत्रालय स्तरावरील कृषि विभागाच्या अधिकारी / कर्मचारी यांना तांत्रिक प्रशिक्षण देण्यासाठी रु. २५ लक्षच्या मर्यादेत सदर योजनेकरिता सन २०१९-२० साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून वित्त विभागाच्या दि. ८.७.२०१९ रोजीच्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार रु. ६०.०० लक्ष एवढा निधी दि.३०.०७.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आलेला आहे.

या योजनेंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या रु. १००.०० लक्ष निधीपैकी रु.६०.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाने ३४५१२९६२ या लेखाशिर्षांर्गत रु. ७०.०० लक्षाचे आठमाहि सुधारीत अंदाज मंजूर केले असल्याने उर्वरित रु.१०.०० लक्ष निधी, राज्य प्रशिक्षण धोरणाच्या तांत्रिक प्रशिक्षणांतर्गत अधिकारी, क्षेत्रिय अधिकारी तसेच आत्मा समिती सदस्यांच्या

प्रशिक्षणाचा व क्षमता बांधणीचा कार्यक्रम वनामती रामेती येथे राबविणे या योजनेंतर्गत सन २०१९-२० करीता आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :

१. सन २०१९-२० मध्ये राज्य प्रशिक्षण धोरणातंर्गत तांत्रिक प्रशिक्षणासाठी शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे ही योजना राबविण्यासाठीवित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२२.०१.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकरानुसार सदर योजनेकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या मंजुर निधीपैकी रु. १०.०० लक्ष ( अक्षरी रुपये दहा लक्ष फ़क्त) एवढ्या निधीच्या आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१९-२० मध्ये मंजुर झालेल्या अनुदानाखाली खालील लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

मागणी क्र. डी-०७

००३, प्रशिक्षण

(०१) (०१) शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण (कृषि) (कार्यक्रम)

५०,इतर खर्च (३४५१ २९६२)

३. या आदेशान्वये राज्य प्रशिक्षण धोरणातंर्गत तांत्रिक प्रशिक्षणासाठी शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे या योजनेकरिता वितरीत करण्यात आलेल्या निधीसंदर्भात आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी तसेच सहायक संचालक ( लेखा-१), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत योजनेअंतर्गत मार्गदर्शक सूचना, मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाचे प्रचलित नियम व अटी यानुसार विविध प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे याकरिता संबंधित अधिकाऱ्यांना आवश्यक त्या सूचना संचालक, आत्मा यांनी निर्गमित कराव्यात.

५. विविध प्रशिक्षणांचा कार्यक्रम संचालक, वनामती यांनी सर्व संबंधित प्राचार्य, रामेती यांच्या समन्वयाने राबवावा .

६. संचालक, वनामती, नागपूर यांनी सन २०१९-२० च्या प्रशिक्षण कॅलेडरबाबत कृषि आयुक्तालयास पाठविलेल्या गोषवाऱ्यातील निर्दशनास आलेल्या बाबींची पूर्तता करण्याची संचालक, आत्मा यांनी दक्षता घ्यावी.

७. सदर योजनेंतर्गत प्रशिक्षणांचे कॅलेंडर प्रशिक्षण मोडयुलसह तयार करुन त्यास कृषि आयुक्तालयाची मान्यता घेण्याची कार्यवाही संचालक, वनामती यांनी करावी.

८. या आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आलेला निधी सन २०१९-२० मध्ये निधी अखर्चीत राहणार नाही, याची सर्व संबंधित यंत्रणांनी दक्षता घ्यावी .

९. सदर योजना राबविण्यासाठी झालेल्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे संचालक, आत्मा यांनी शासनास वेळोवेळी सादर करावीत .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१३१०५७४९३५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.06.22 15:01:46 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती -**

१) मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय, पुणे
५) संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, पुणे
६) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
९) संचालक वनामती, नागपूर
१०) उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
११) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१२) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१३) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१७) वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
१८) नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
१९) कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) निवड नस्ती (कार्यासन-३अे)